राष्ट्रीय अन्न सुरक्षा अधिनियम, २०१३ च्या कलम १५ अन्वये मुंबई-ठाणे शिधावाटप क्षेत्रासाठी जिल्हा तक्रार निवारण अधिकारी नेमण्याबाबत..

# महाराष्ट्र शासन

## अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग

## शासन निर्णय क्रमांकः असुका २०१३/प्र.क्र ३६१/नापु-२२,

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
तारीख: २० फेब्रुवारी, २०१५

**वाचा**

**शासन निर्णय क्रमांकः शासन निर्णय क्रमांक असुका २०१३/प्र.क्र ३६१/नापु-२२, दि. ८ जानेवारी,२०१४**

**प्रस्तावना**

राष्ट्रीय अन्न सुरक्षा अधिनियम, २०१३ च्या कलम १५ अन्वये सदर अधिनियमातील प्रकरण दोन अन्वये हक्क असलेले अन्नधान्य वितरणासंबंधी बाबींमध्ये व्यथित झालेल्या व्यक्तींची तक्रार शीघ्र व प्रभावी रितीने दूर करण्यासाठी आणि या अधिनियमाच्या हक्कांची अंमलबजावणी करण्यासाठी प्रत्येक जिल्ह्यासाठी एक जिल्हा तक्रार निवारण अधिकारी नेमण्याची तरतूद करण्यात आली आहे. त्यानुसार दि. ८ जानेवारी,२०१४ रोजीच्या शासनिर्णयान्वये राज्यातील सर्व जिल्ह्यांचे संबंधित जिल्हाधिकारी यांची जिल्हा तक्रार निवारण अधिकारी (District Grievance Redressal Officer) म्हणून नेमणूक करण्यात आलेली आहे. जिल्हास्तरावर पुरवठा विभागाच्या सर्व योजनांच्या अंमलबजावणीची जबाबदारी जिल्हाधिकारी यांच्याकडे असल्यामुळे राष्ट्रीय अन्न सुरक्षा अधिनियमांतर्गत अपेक्षित असलेले तक्रार निवारणाचे कामकाज जिल्हाधिकारी यांच्याकडे उपरोक्त शासन निर्णयान्वये सोपविण्यात आलेले आहे. मुंबई-ठाणे शिधावाटप क्षेत्रामध्ये विभागाच्या सर्व योजनांच्या अंमलबजावणीची जबाबदारी नियंत्रक, शिधावाटप व संचालक, नागरी पुरवठा, मुंबई यांच्याकडे असून ते सदर क्षेत्रातील शिधावाटप यंत्रणेचे प्रमुख आहेत. त्यामुळे मुंबई-ठाणे शिधावाटप क्षेत्राकरीता राष्ट्रीय अन्न सुरक्षा अधिनियमांतर्गत अपेक्षित असलेले तक्रार निवारणाचे कामकाज नियंत्रक, शिधावाटप व संचालक, नागरी पुरवठा, मुंबई यांच्याकडे सोपविण्याचे शासनाच्या विचाराधीन होते. तसेच जिल्हा पुरवठा अधिकारी, ठाणे यांच्या कार्यक्षेत्रापुरतेच कार्यक्षेत्र जिल्हा तक्रार निवारण अधिकारी म्हणुन जिल्हाधिकारी, ठाणे यांच्याकडे ठेवण्याबाबतची बाबही शासनाच्या विचाराधीन होती. त्यानुषंगाने पुढीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे:-

## शासन निर्णय

१) मुंबई, मुंबई उपनगर व तसेच ठाणे जिल्हयातील जिल्हा पुरवठा अधिकारी यांचे कार्यक्षेत्र वगळता इतर कार्याक्षेत्राकरीता नियंत्रक, शिधावाटप व संचालक, नागरी पुरवठा, मुंबई यांची "जिल्हा तक्रार निवारण अधिकारी म्हणून नेमणुक करण्यात येत आहे. "

१) जिल्हाधिकारी, ठाणे यांची जिल्हा तक्रार निवारण अधिकारी म्हणून असणारी कार्यकक्षा ही जिल्हा पुरवठा अधिकारी, ठाणे यांच्या कार्यक्षेत्रापुरतीच मर्यादीत राहील.

२) इतर जिल्हयांकरीता दि. ८.१.२०१४ च्या शासन निर्णयामधील परिच्छेद १ मध्ये नमुद केलेले आदेश कायम राहतील. तसेच मुंबई-ठाणे शिधावाटप क्षेत्र, ठाणे जिल्हा व इतर सर्व जिल्हयांकरीता दि. ८.१.२०१४ च्या शासन निर्णयातील परिच्छेद २ मधील तरतूद लागु राहील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०२२१११५९४६३२०६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Deepak Shiv Kapoor

Digitally signed by Deepak Shiv Kapoor
DN: c=IN, o=ALL INDIA SERVICES, ou=IAS, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Deepak Shiv Kapoor
Date: 2015.02.21 12:08:46 +05'30'

**(दीपक कपूर)**

सचिव,अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग

**प्रत,**

१) मा. राज्यपाल यांचे सचिव,
२) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,
३) मा. उप मुख्यमंत्री यांचे सचिव,
४) सर्व विभागीय आयुक्त,
५) नियंत्रक, शिधावाटप व संचालक, नागरी पुरवठा, मुंबई,
६) सर्व जिल्हाधिकारी,
७) सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद,
८) सर्व उपायुक्त पुरवठा,
९) सर्व जिल्हा पुरवठा अधिकारी,
१०) सर्व अन्नधान्य वितरण अधिकारी,
११) सर्व मंत्रालयीन विभाग,
१२) वित्तीय सल्लागार व उप सचिव, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, मुंबई
१३) मा. मंत्री, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण यांचे खाजगी सचिव,
१४) मा. राज्यमंत्री, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण यांचे खाजगी सचिव,
१५) सर्व अधिकारी (सचिव वगळून), अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग,
१६) सर्व कार्यासने, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग,
१७) सर्व कार्यासने, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग,
१८) सर्व खाजगी सचिव, मा. मंत्री कार्यालये, मंत्रालय, मुंबई.
१९) सर्व खाजगी सचिव, मा. राज्यमंत्री कार्यालये, मंत्रालय, मुंबई.
२०) महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई
२१) ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, ग्रंथालय, ६वा मजला, विधानभवन, मुंबई
२२) सर्व विधान परिषद सदस्य व विधानसभा सदस्य.
२३) सचिव, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग यांचे स्वीय सहाय्यक,
२४) निवडनस्ती (कार्यासन नापु-२२)